**गु. प्र. शाखा, गु.र. क्र. ४९/२०१९ (आग्रीपाडा पोलीस ठाणे, मुंबई गु.नों.क्र.१५७/ २०१९) (डॉ. पायल तडवी आत्महत्या प्रकरण) मधून उद्भवणा-या न्याय प्रकरणी मा. विशेष सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज हाताळण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. प्रदीप घरत यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- एसपीपी-०५१९/प्र.क्र.२०४/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भ** :- १) विधि व न्याय विभाग, शासन अधिसूचना क्र. एसपीपी-१०१९/यु.ओ.आर.२५/डी-१४, दिनांक ०१.०६.२०१९

२) विधी व न्याय विभागाच्या अधिसूचना क्रमांक एसपीपी-१०१९/यु.ओ.आर.२५/डी-१४, दिनांक ०६.०७.२०२०

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक २९ जुलै, २०१५ व दिनांक१६ जून, २०१७

**प्रस्तावना :-**

गुन्हे प्रकटीकरण शाखा, गु.र.क्र. ४९/२०१९ (आग्रीपाडा पोलीस ठाणे, गु.र.नं.१५७/२०१९), भा.दं.वि. ३०६, ३४ सह ४ महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट सह कलम ३(१०) अनुसूचित जाती व जमाती अत्याचार प्रतिबंधक कायदा सह कलम ६७ माहिती तंत्रज्ञान कायदा २००० अन्वये दाखल प्रकरणात उद्भवणाऱ्या मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई प्रकरणी शासनाची बाजू भक्कमपणे मांडण्यासाठी ॲड श्री. राजा ठाकरे यांची संदर्भ क्र. १ येथील अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून करण्यात आलेली नियुक्ती रद्द करुन संदर्भ क्र. २ येथील अधिसूचनेन्वये ॲड श्री. प्रदीप घरत यांची विशेष सरकारी अभियोक्ता विधि व न्याय विभागाने नियुक्ती केलेली आहे.

त्या अनुषंगाने उक्त न्याय प्रकरणी मा. न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. प्रदिप घरत यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गु.प्र.शाखा, गु.प्र.क्र.४९/२०१९ (आग्रीपाडा पोलीस ठोण, गु.नों.क्र.१५७/२०१९) मधून उद्भवलेल्या न्याय प्रकरणी मा. विशेष सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्यावतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. प्रदिप घरत यांना सदर प्रकरण निकाली निघाल्याशिवाय त्यांच्या व्यावसायिक फी मध्ये कोणत्याही प्रकारे वाढ करण्यात येणार नाही, या अटीसह प्रतिदिन परिणामकारक न्यायालयीन सुनावणीकरीता खालीलप्रमाणे व्यावसायिक फी च्या दराने अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**मा. विशेष एस.सी.एस.टी न्यायालय व मा. सत्र न्यायालय सुनावणीकरीता**

अ) प्रतिदिन न्यायालयीन सुनावणी फी - रुपये ३०,०००/- (रुपये तीस हजार फक्त)
ब) विचारविनिमय फी (प्रति बैठक) - रुपये १०,०००/- (रुपये दहा हजार फक्त)

**मा. उच्च न्यायालय सुनावणीकरीता**

अ) प्रतिदिन न्यायालयीन सुनावणी फी - रुपये ४०,०००/-(रुपये चाळीस हजार फक्त)
ब) विचारविनिमय फी (प्रति बैठक) - रुपये १०,०००/- (रुपये दहा हजार फक्त)

तसेच ॲड श्री. प्रदिप घरत यांना अपरिणाकारक सुनावणीकरीता कोणतीही व्यावसायिक फी देय राहणार नाही. ॲड श्री. प्रदिप घरत यांना व्यावसायिक फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत.

२. ॲड. श्री. प्रदिप घरत यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान दर दोन महिन्याच्या न्यायालयीन कामकाजानंतर करण्यात यावे. न्यायालयीन कामकाजाचे परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड. श्री. प्रदिप घरत यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्तांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्रमांक बी - १, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२)(०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ २८१/२०/व्यय-७, दि. २७/०८/२०२० मिळालेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय दि.२९.०७.२०१५ व दि.१६.०६.२०१७ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२०१०२०१६२४४६११२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao
Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.20 16:26:29 +05'30'

**(किशोर भालेराव)**
**उप सचिव (विधि), गृह विभाग**

**प्रत,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२. सह पोलीस आयुक्त, आर्थिक गुन्हे विभाग, पोलीस आयुक्त कार्यालय आवार, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई-१,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. ॲड श्री. प्रदिप घरत,६/६०३, क्षितीज को-ऑप हौ.सो.लि., माहिम कापड बझार रोड, स्टेप इन हॉटेल जवळ, माहिम, मुंबई- ४०००१६.
७. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती- पोल-१०.